वातावरणीय बदलासंबंधी राज्याचा कृती आराखडयाचा प्रकल्प अहवाल तयार करण्यासाठी निधी वितरित करणे बाबत.

महाराष्ट्र शासन
पर्यावरण विभाग
शासन निर्णय क्र. इएनव्ही -२०१४ /प्र.क्र.११६ /तां.क१
नवीन प्रशासन भवन, १५ वा मजला
मादाम कामा मार्ग,मुंबई-४०० ०३२
दिनांक :- २७ फेब्रुवारी,२०१५

**वाचा :** १) शासन निर्णय पर्यावरण विभाग क्र.क्लायमेंट चेंज-२००९/प्र.क्र.७७ /तां.क३ दि.१६ नोव्हेंबर,२००९.
२) शासन निर्णय पर्यावरण विभाग क्र इएनव्ही -२०१० /प्र.क्र.१६ /तां.क३ दि. २३ मार्च, २०१०.
३) शासन निर्णय पर्यावरण विभाग क्र.इएनव्ही -२०१०/प्र.क्र.१६/ तां.क.३ दि. २६/३/२०१२
४) शासन निर्णय पर्यावरण विभाग क्र.इएनव्ही२०१४/प्र.क्र.११६/तां.क१ दि.६/०२/२०१५
५) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र अंदाज - २०१३/प्र.क्र८५/अर्थसंकल्प -३ दि-९/२/२०१५

**शासन निर्णय :**

राष्ट्रीय स्तरावरील घोषित वातावरणीय बदलासंबधित कृती आराखडयाच्या अनुषंगाने महाराष्ट्र राज्यावर होणारा वातावरणीय बदलासंबंधित परिणाम व त्यासाठी अवलंबवयाच्या धोरणासंबंधी प्रक्रल्प अहवाल तयार करण्यासाठीची जबाबदारी " द एनर्जी ॲन्ड रिसोर्सेस इन्स्टिटयूट "(टेरी) या संस्थेकडे संदर्भाधीन दि.१६ नोव्हेंबर,२००९ च्या शासन निर्णयाद्वारे देण्यात आली आहे. त्यासाठी एकूण रु.९८.०० लाख एवढा निधी टेरी या संस्थेस मंजूर करण्यात आला आहे. त्यामधून सदर संस्थेस पहिला हप्ता म्हणून रु. २०.०० लाख (रुपये वीस लाख फक्त) संदर्भाधीन दि.२३ मार्च, २०१० च्या शासन निर्णयाद्वारे मुक्त करण्यात आलेला आहे आणि संदर्भ क्र.३, दि. २६ मार्च, २०१२ च्या शासन निर्णयान्वये रुपये २५ लाख एवढी रक्कम टेरी या संस्थेस वितरीत करण्यात आली आहे. तसेच संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयाद्वारे - रु.२५ लाख एवढा निधी सन २०१४-२०१५ च्या अर्थसंकल्पिय तरतुदीमधून ६०%च्या मर्यादेत तिसरा हप्ता म्हणून मुक्त करण्यास व वितरीत करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

२. आता वित्त विभागाने दि.९.२.२०१५ च्या परिपत्रकानुसार योजनांतर्गत तरतुदीमधुन ७५% एवढा निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात आली आहे. त्यामुळे परिच्छेद ४ मध्ये नमूद केलेल्या (३४३५१३०२)३१ सहायक अनुदाने(वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली २०१४-२०१५ या वर्षासाठी अर्थसंकल्पित केलेल्या रु.२०० लक्ष एवढया तरतुदीपैकी रु.१.५० कोटी एवढी तरतुद प्रत्यक्ष विवरणासाठी उपलब्ध झाली आहे.

सदर तरतुदीमधून आतापर्यत रु.१.२० कोटी एवढी तरतूद वितरीत करण्यात आला आहे. त्यापैकी रु.२५ लाख एवढा निधी टेरी या संस्थेस संदर्भ क्र ४ द्वारे वितरीत करण्यात आला आहे.याद्वारे रु. १८ लाख (रुपये अठरा लाख फक्त ) एवढा निधी टेरी या संस्थेस मुक्त व वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर रक्कम अधिदान व लेखा अधिकारी यांच्या मार्फत/कोषागारातून काढून "द एनर्जी ॲन्ड रिसोर्सेस इन्स्टिटयूट "(टेरी) या संस्थेस अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्री. र.ल.लखोटे, कक्ष अधिकारी, पर्यावरण विभाग व नियंत्रण अधिकारी म्हणून श्री.सो.ना.बागुल, उपसचिव, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मंबई यांना घोषित करण्यात येत आहे. त्यांनी" द एनर्जी ॲन्ड रिसोर्सेस इन्स्टिटयूट" (टेरी) The Energy and Research Institute (TERI) यांना रू. १८.०० लक्ष (अक्षरी रुपये अठरा लक्ष फक्त) अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई येथून स्वतंत्र धनादेशाद्वारे वितरीत करण्याची कार्यवाही करावी.

४. यासाठी होणारा खर्च मागणी क्र.यु-४, ३४३५-परिस्थितीकी व पर्यावरण, ०४,प्रदुषण प्रतिबंध व नियंत्रण १०३,वायू व जलप्रदुषण प्रतिबंध-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना (०२)(१३)पर्यावरण विषयक जनजागृती शिक्षण, वातावरण बदल कृती योजना ( ३४३५ १३०२) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या मुख्य लेखाशीर्षाखाली खर्ची घालावा व तो सन २०१४-१५ या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात उपरोक्त लेखाशीर्षाखाली एकूण रू.२०० लक्ष एवढी तरतूद मंजूर व अर्थसंकल्पित करण्यात आली आहे. त्यापैकी रु.१.५० कोटी एवढी तरतुद ७५% च्या मर्यादेत राहून, वितरणासाठी उपलब्ध झाली आहे. हा वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.अंदाज२०१३/प्र.क्र८५/अर्थ-३ दि ९.२.२०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय हा महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०३०३१२२२१६१३०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Devidas Kerbaji Mankar

Digitally signed by Devidas Kerbaji Mankar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=ENVIRONMENT DEPT, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Devidas Kerbaji Mankar
Date: 2015.03.03 12:32:05 +05'30'

**(दे.के.मानकर)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
२) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३) प्रधान सचिव,नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
४) प्रधान सचिव.वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५) अपर मुख्य सचिव, कृषि विभाग, मंत्रालय, मुंबई
६) प्रधान सचिव.नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

७) प्रधान सचिव.मदतकार्य व पुनर्वसन विभाग, मंत्रालय, मुंबई
८) डायरेक्टर जनरल, द एनर्जी ॲन्ड रिसोर्सेस इन्स्टिटयूट (टेरी)
९) सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ,मुंबई
१०) अपर मुख्य सचिव, पर्यावरण यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई
११) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा) महा -१ व महा -२- मुंबई/नागपूर,
१२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१३) निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई,
१४) वित्त विभाग (अर्थ-७ /व्यय-१६ ),मंत्रालय,मुंबई,
१५) पर्यावरण विभागातील सर्व कार्यासने.
१६) निवडनस्ती.

.